**शिक्षक प्रशिक्षण या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील (पहिला हप्ता) केंद्र व राज्य शासनाच्या आदिवासी उपयोजना (STSP) लेखाशीर्षातून वेतनासाठीची रक्कम वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अनुवि- ४११६/(८४/१६)/प्रशिक्षण**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: १० मार्च, २०१७

वाचा -

**मनुष्यबळ व विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ ४४-०७/२०१५-ईई-९, दिनांक ०८.०८.२०१६.**

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने सन-२०१६-१७ पासून केंद्र पुरस्कृत योजनांच्या केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण बदलले असून, केंद्र-राज्य हिश्याचे प्रमाण ६०:४० असे निश्चित केले आहे. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत आदिवासी उपयोजना (STSP) लेखाशीर्षातंर्गत दि.८/८/२०१६ च्या पत्रान्वये वेतनासाठी पहिला हप्ता उपलब्ध करून दिलेला आहे. तथापि, सदर योजनेमध्ये वेतनाकरिता उणे प्राधिकार उपलब्ध असल्याने वेतनावरील खर्च जास्त झाल्याचे दिसून येते. त्याअनुषंगाने आदिवासी उपयोजना (STSP) या लेखाशीर्षातून सन २०१६-१७ करिता केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेला १ ला हप्त्याचा निधी यापूर्वीच खर्च झाल्याने सदर निधी समायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत आदिवासी उपयोजना (STSP) लेखाशीर्षाखाली केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता पहिला हप्ता (६०%) रु.१५२.७१ लाख शासनास वितरित केलेला आहे. केंद्र हिश्याच्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.१०१.८१ लाख इतका येतो. त्यानुसार केंद्र शासनाने वितरीत केलेला रू.१५२.७१ लाख व राज्य हिस्सा रू.१०१.८१ लाख अशी एकूण रू.२५४.५२ लाख इतका निधी खालील विवरणपत्रानुसार समायोजित करण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| पहिला हप्ता | केंद्र शासनाच्या पत्राच दिनांक | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|
| STSP Head | दि.०८/०८/२०१६ | १५२.७१ | १०१.८१ | २५४.५२ |

केंद्र शासनाने दि.०८/०८/२०१६ च्या पत्रान्वये वितरीत केलेल्या रु.१५२.७१ लाख व त्याअनुषंगाने राज्य हिस्सा रु.१०१.८१ लाख असा एकूण रु.२५४.५२ लाख इतका निधी समायोजित करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर खर्च मागणी क्र टी-५ २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना

(०१)(०१)-शिक्षकांचे प्रशिक्षण (२२०२।१६५) व मागणी क्र.टी-५ २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१)(०२)-शिक्षकांचे प्रशिक्षण (२२०२।२५४)" या लेखाशीर्षातून सन-२०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून समायाजित करण्यात यावा

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.१७/अर्थ-१९, दि.०४/०२/२०१७ व अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकामधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५११०६३०४०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.03.15 11:07:45 +05'30'

( डॉ.सुवर्णा खरात )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
३. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
५. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य पुणे
६. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
५. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.
१०. निवडनस्ती.